तात्काळ

शासकीय व निमशासकीय कर्मचाऱ्यांच्या दिनांक २१ मे, २००३ रोजी होणाऱ्या लाक्षणिक संपाबाबत करावयाची कार्यवाही.

महाराष्ट्र शासन
सामान्य प्रशासन विभाग
शासन परिपत्रक, क्रमांक एसटीके-१००३/प्र.क्र.१०३/२००३/१६-अ.
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२
दिनांक : २० मे, २००३

## परिपत्रक

राज्य सरकारी कर्मचारी मध्यवर्ती संघटना, महाराष्ट्र, महाराष्ट्र राज्य जिल्हा परिषद कर्मचारी महासंघ व महाराष्ट्र राज्य चतुर्थ श्रेणी कर्मचारी संघटना (मध्यवर्ती) यांनी त्यांच्या विविध मागण्यांकडे शासनाचे लक्ष वेधण्याकरीता दि.२१ मे, २००३ रोजी एक दिवसाचा लाक्षणिक संप करणार असल्याची सूचना दिली आहे. सदर संपामध्ये राज्य शासकीय कर्मचाऱ्यांच्या इतर संघटनांचे सदस्यही सामील होण्याची शक्यता आहे.

२. शासकीय कर्मचाऱ्यांच्या दि. २१ मे, २००३ रोजी होणाऱ्या एक दिवसाच्या लाक्षणिक संपकाळात शासकीय कामकाज सुरळीतरित्या चालण्याच्या दृष्टीने सर्व मंत्रालयीन विभाग तसेच त्यांच्या अधिपत्याखालील कार्यालयांना पुढे दर्शविल्याप्रमाणे उपाययोजना करण्याच्या सूचना देण्यात येत आहेत.

१) शासकीय कर्मचाऱ्यांनी संपात भाग घेणे गैरवर्तणूक समजण्यात येईल व अशा कर्मचाऱ्यांविरुद्ध शिस्तभंगाची कारवाई करण्यात येईल. अशा प्रकारचे आदेश निर्गमित करण्यात यावेत व ते सर्व कर्मचाऱ्यांच्या निदर्शनास आणून त्या आदेशाची प्रत सूचना फलकावर लावण्यात यावी.

२) कर्मचाऱ्यांनी संपात भाग न घेण्याविषयी व नेहमीप्रमाणे कार्यालयात उपस्थित राहण्यासाठी त्यांचे मन वळविण्याचा प्रयत्न करावा.

३) संपकाळात कार्यालये उघडण्याची व बंद करण्याची योग्य ती व्यवस्था करावी व ती व्यवस्था जबाबदार अधिकाऱ्यांकडे द्यावी. गरज भासल्यास गृहरक्षक दलाची मदत घ्यावी.

४) कार्यालयप्रमुखांनी संपकाळात आपले मुख्यालय सोडून जाऊ नये.

५) कार्यालय प्रमुखांनी या आदेशाच्या दिनांकापासून लाक्षणिक संप संपेपर्यंत कोणत्याही शासकीय कर्मचाऱ्यास कोणत्याही प्रकारची रजा मंजूर करु नये आणि जे कर्मचारी रजेवर असतील अशा प्रत्येक प्रकरणी विचार करुन त्यांची रजा रद्द करुन त्यांना कामावर तात्काळ बोलवावे किंवा कसे ते ठरवावे.

६) शासकीय कर्मचाऱ्यांच्या संपाबाबत केंद्र शासनाचे 'काम नाही वेतन नाही' हे धोरण राज्य शासनही अनुसरत असल्याचे कर्मचाऱ्यांना अवगत करावे.

३. सर्व मंत्रालयीन विभागांनी त्यांच्या अधिपत्याखालील कार्यालयांमध्ये अत्यावश्यक सेवा संपकाळात सुरळीत सुरु राहतील याबाबत उपाययोजना कराव्यात.

४. मंत्रालयीन विभागांनी या परिपत्रकातील सूचना विभाग प्रमुखांना/ त्यांच्या अधिपत्याखालील कार्यालय प्रमुखांना कळविण्याची व्यवस्था करावी.

५. सदर संपाच्या दिवशी कार्यालयात उपस्थित असलेल्या कर्मचाऱ्यांची माहिती क्षेत्रीय अधिकाऱ्यांनी त्यांच्याशी संबंधित मंत्रालयीन विभागांना कळवावी व मंत्रालयीन विभागांनी त्यांच्या विभागातील व अधिपत्याखालील कार्यालयांची संकलित माहिती सोबत जोडलेल्या प्रपत्रात दि.२१.५.२००३ रोजी दुपारी १२.०० पर्यंत या विभागाच्या कार्यासन १६-अ, नवीन प्रशासन भवन, १३ वा मजला, कडे द्यावी.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने.

(द.त्र्यं.कुलकर्णी)
शासनाचे उप सचिव

प्रति,

राज्यपालांचे सचिव,
मुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव,
उपमुख्यमंत्र्यांचे सचिव,
सर्व मंत्री / राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव,
शासनाचे सर्व अपर मुख्य सचिव / प्रधान सचिव / सचिव,
सर्व विभागीय आयुक्त,
सर्व जिल्हाधिकारी,
सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद,
मंत्रालयीन विविध विभागाच्या नियंत्रणाखालील सर्व इतर विभाग प्रमुख व कार्यालय प्रमुख,
प्रबंधक, उच्च न्यायालय, मूळ न्याय शाखा, मुंबई,
प्रबंधक, उच्च न्यायालय, अपील शाखा, मुंबई,
प्रबंधक, महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण, मुंबई,
प्रबंधक, लोक आयुक्त व उप लोक आयुक्त, मुंबई,
सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई,
सचिव, महाराष्ट्र विधान मंडळ सचिवालय, विधानभवन, मुंबई,
सचिव, उच्च न्यायालय, मूळ न्याय शाखा, मुंबई,
सचिव, राज्य निवडणूक आयोग,
मंत्रालयातील सर्व विभाग,
सामान्य प्रशासन विभागातील सर्व कार्यासने,
निवड नस्ती.

## प्रपत्र - अ

मंत्रालयीन विभागातील / त्यांच्या अधिपत्याखालील कार्यालयातील कर्मचाऱ्यांची दि.२१.५.२००३ रोजी असलेल्या उपस्थितीबाबतची माहिती.

### मंत्रालयीन विभाग

| संवर्ग | एकूण अधिकारी / कर्मचाऱ्यांची संख्या | पूर्व परवानगीने रजेवर असलेले (संख्या) | संपात सहभागी झालेले (संख्या) | कार्यालयात उपस्थित असलेले (संख्या) |
|---|---|---|---|---|
| गट - अ | | | | |
| गट - ब | | | | |
| गट - क | | | | |
| गट - ड | | | | |

## प्रपत्र - ब

| संवर्ग | एकूण अधिकारी / कर्मचाऱ्यांची संख्या | पूर्व परवानगीने रजेवर असलेले (संख्या) | संपात सहभागी झालेले (संख्या) | कार्यालयात उपस्थित असलेले (संख्या) |
|---|---|---|---|---|
| गट - अ | | | | |
| गट - ब | | | | |
| गट - क | | | | |
| गट - ड | | | | |

(कृ.मा.प.)